माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील जिल्हा माहिती अधिकारी , गट-अ (कनिष्ठ) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मावज-२०१६/प्र.क्र.१७० (६) /३४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील जिल्हा माहिती अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) या संवर्गातील श्री. प्रे. ई. गडेकर, जिल्हा माहिती अधिकारी, माहिती केंद्र, नागपूर यांची बदली प्रशासकीय कारणास्तव जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री.प्रे.ई. गडेकर यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. श्री. प्रे.ई. गडेकर यांनी बदलीच्या पदावर तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा अहवाल महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांना तसेच शासनास विनाविलंब सादर करावा.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११९३६०२०१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan
Narayanrao
Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2017.03.31 19:37:44 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परिक्षा), नागपूर,
५. संचालक (माहिती)(प्रशासन)/ (वृत्त व जनसंपर्क)/ (माध्यम समन्वयक), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, अमरावती-नागपूर विभाग, नागपूर,
७. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
८. जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, नागपूर,
९. जिल्हा माहिती अधिकारी, माहिती केंद्र, नागपूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
११. संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
१२. निवडनस्ती.